सन २०१९-२० करीता इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) योजनेंतर्गत येडशी रामलिंगघाट वन्यजीव अभयारण्य या निसर्ग पर्यटन स्थळाच्या विकास कामांकरिता निधी वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. निसप-२०१९/प्र.क्र.३१८/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०५ नोव्हेंबर, २०१९

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९
२. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४४/११५२/२०१९-२०, दिनांक १९.१०.२०१९
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२/(यो)/येडशी रामलिंगघाट/२८८/१९-२०, दिनांक ०३.१०.२०१९
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२/(यो)/ताम्हीणी/२८९/१९-२०, दिनांक ०३.१०.२०१९

प्रस्तावना :-

सन २०१९-२० राज्य योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ५६००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत असून त्यापैकी निसर्ग पर्यटनाकरिता रु.३०००.०० लक्ष इतका निधी मंजूर व अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष २०१९-२० च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (BEAMS) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०१९-२० च्या प्रथम नऊ माहीकरीता (डिसेंबर,२०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज नियंत्रण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने निसर्ग पर्यटनाकरीता रु.३०००.०० लक्षपैकी रु.१८००.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत आतापर्यंत विविध शासन निर्णयान्वये रु.१७५७.१९४ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला असून, रु.४२.८०६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यासाठी शिल्लक आहे.

येडशी रामलिंगघाट वन्यजीव अभयारण्य या निसर्ग पर्यटन स्थळांचा आराखडा दिनांक १९.०९.२०१५ ला झालेल्या महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळाच्या कार्यकारणी समितीच्या सभेत सन २०१५-१६ ते २०१९-२० या कालावधी करीता मंजूर झालेला असून, आराखडयाची एकूण किंमत रु.१०४.७५ लक्ष आहे. त्यापैकी सन २०१९-२० करीता रु.३९.३४ लक्षचा चालू बाब प्रस्ताव व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांनी शिफारशीसह सादर केला आहे. या निसर्ग पर्यटन स्थळाला सन २०१५-१६ मध्ये रु.५.८५ लक्ष, सन २०१६-१७ मध्ये रु.७.६२ लक्ष, सन २०१७-१८ मध्ये रु.१९.५० लक्ष व सन २०१८-१९ मध्ये रु.१३.१५ लक्ष असा एकूण रु.४६.१२ लक्षचा निधी वाटप करण्यात आलेला आहे.

सन २०१९-२० करीता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई यांचे नियंत्रणाखालील येडशी रामलिंगघाट वन्यजीव अभयारण्य रु.२२.९४ लक्ष व मुख्य वनसंरक्षक (प्रा.) पुणेयांचे नियंत्रणाखालील ताम्हणी वन उद्यान रु.१६८.६५ लक्ष असा एकूण रु.२०७.९९ लक्षचा चालू बाब प्रस्ताव संदर्भ क्र.३ व ४ अन्वये व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांनी शिफारशीसह सादर केला आहे. सदर प्रस्ताव संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्तावास शासन मंजूरी प्रदान करुन BDS द्वारे अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे. वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार ६० टक्केच्या मर्यादेत यडशी रामलिंगघाट वन्यजीव अभयारण्य या निसर्ग पर्यटन स्थळाचा रु.३९.३४ लक्षचा प्रस्तावास निधी वितरीत करता येईल. त्यानुसार सदर प्रस्तावातील कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्र.२ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रक विचारात घेता प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई यांचे नियंत्रणातील खालील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या निसर्ग पर्यटन स्थळासाठी सन २०१९-२० करीता इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षा अंतर्गत सोबतच्या "**प्रपत्र - अ"** मध्ये नमुद केलेल्या व्हॅयू पॉईट विकसीत करणे व वृक्ष लागवड करणे या कामाकरिता **रु.३९.३४ लक्ष** इतका निधी विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

| **अ. क्र.** | **अमंलबजावणी अधिकारी/ नियंत्रक अधिकारी** | **निसर्ग पर्यटन स्थळाचे क्षेत्र** | **सन २०१९-२० करीता प्रस्तावित रक्कम (रु.लाखात)** |
|---|---|---|---|
| १ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई | येडशी रामलिंगघाट वन्यजीव अभयारण्य | ३९.३४ |
| | | **एकुण :-** | **३९.३४** |

अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखडयाप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही. याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
४. संस्थेने आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.

८. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशांची अवहेलना होणार नाही याची सुध्दा दक्षता घ्यावी.

९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई यांनी संबंधीत निसर्ग पर्यटन स्थळातील सदर कामांच्या अंदाजपत्रकांची आवश्यकतेनुसार पडताळणी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून करुन घ्यावी.

१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांनी उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती नुसार निविदा प्रक्रियेत ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

१२. प्रस्तावित कामांमध्ये निसर्गपुरक असलेले साहित्याचा जास्तीत जास्त वापर करावा.

१३. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

१४. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०८.०७.२०१९ चे परिपत्रकातील नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१५. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१६. विविध ठिकाणी असलेल्या कामाची एकत्रित रक्कम रु.३.०० लाखापेक्षा जास्त असल्यास ई-निविदा कार्यप्रणाली वापरणे बंधनकारक राहील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-७, प्रधान शिर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०५१५०३१५८०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2019.11.05 15:05:17 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई
५. विभागीय वन अधिकारी (वन्यजीव) औरंगाबाद
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
८. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

**"प्रपत्र - अ"**

**शासन निर्णय क्र.निसप-२०१९/प्र.क्र.३१८/फ-९, दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१९ सोबतचे प्रपत्र-अ**

| अ. क्र. | बाब निहाय कामे | सन २०१९-२० करीता प्रस्तावित रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|
| **येडशी रामलिंगघाट वन्यजीव अभयारण्य** | | |
| १ | मौजे येडशी येथे सितान्हानी धबधब्याजवळ व्हॅयू पॉईट विकसीत करणे कं.न.१९२ | २.६४ |
| २ | मौजे येडशी कं.न.१९२ येथे सितान्हानी धबधब्याजवळ झाडा भोवती ओटे बांधणे | २.७६ |
| ३ | मौजे येडशी येथे रेल्वे ट्रॅकवर शोभिवंत/सावली देणाऱ्या वृक्षाची लागवड करणे ६ कि.मी. | ३३.९४ |
| | **एकूण :-** | **३९.३४** |

******************